सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या संगणकीकरण प्रकल्पासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत ...

संकलनकर्त्यास मानधन

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साविबा - २०१५/प्र.क्र. ८ /सं.क**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीखः २९ मार्च, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक-साविबा/२०१२ प्र.क्र.४१/सं.क ,.दि.२५ ऑगस्ट २०१५
२) शासन निर्णय क्रमांक-साविबा २०१५/प्र.क्र.८/सं.क., दि. १० फेब्रुवारी २०१६
३) शासन निर्णय क्रमांक-साविबा २०१५/प्र.क्र.२०/सं.क ,.दि.१८ मे २०१६

**प्रस्तावना -**

राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या संगणकीकरणाचा प्रकल्प राबविण्यात येत असून त्या अंतर्गत Pre-printed form द्वारे माहिती संकलित करण्यासाठी दि.१८ मे २०१६ च्या शासननिर्णयान्वये संकलनकर्त्यास प्रति शिधापत्रिका रूपये ५/- याप्रमाणे मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. राज्यातील एकूण शिधापत्रिका संख्या २.४६ कोटी असून प्रति शिधापत्रिका रूपये ५/- याप्रमाणे एकूण रू. १२,३०,९३,१६५ /- (रूपये बारा कोटी तीस लाख त्र्याण्णव हजार एकशे पासष्ट फक्त) एवढ्या देय रकमेपैकी ५०% या मर्यादेत अग्रिम स्वरूपात निधी म्हणजेच रू.६,१५,४९,०००/- (रूपये सहा कोटी पंधरा लाख एकोणपन्नास हजार फक्त) उपरोक्त संदर्भाधीन २ अन्वये शासनस्तरावरून सर्व क्षेत्रीय कार्यालयांना वितरीत करण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय-**

२. क्षेत्रीय कार्यालयांना उर्वरित आवश्यक निधीचा वेळेत विनियोग करणे शक्य व्हावे याकरिता Pre-printed Form च्या संकलनकर्त्यास मानधनापोटी आवश्यक निधी वितरीत करणे शासनाच्या विचाराधीन होते. तद्नुषंगाने, खालील तक्त्यातील नमूद क्षेत्रीय कार्यालयांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या मर्यादेत तरतूद खर्च करण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखांत)

| अ.क्र. | जिल्हयाचे नांव | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | अ परिमंडळ, परेल | ११.४२ |
| २ | ठाणे | ५.२६ |
| ३ | नंदुरबार | ८.०० |
| ४ | सांगली | १७.०० |
| ५ | नांदेड | ११.६७ |
| ६ | लातूर | ११.०१ |
| ७ | अमरावती | १५.३३ |
| ८ | वाशिम | ३.७२ |
| ९ | गडचिरोली | ३.७१ |
| | **एकूण** | **८७.१२** |

३. हा निधी वितरीत करण्यासाठी रू.८७.१२ लक्ष (रूपये सत्त्याऐंशी लक्ष बारा हजार फक्त) एवढी तरतूद वितरित करण्यात येत असून हा निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र. एम-३, ३४५१-सचिवालय आर्थिक सेवा, (००) (०९०) सचिवालय, (००) (०४) लक्ष्यित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण (केंद्र हिस्सा) (योजनातंर्गत) (दत्तमत) (३४५१ ३०८१) १७, (संगणक खर्च) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. तसेच, शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून करण्यात यावा व वित्तीय बाबींच्या अनुषंगाने लागू असणाऱ्या सर्व तरतुदींचे पालन व्हावे.,

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१२२२५३९६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahadeo
Giridhari Jogdand

Digitally signed by Mahadeo Giridhari Jogdand
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfa03bccc5d29403a28c83f3ad74b7ce2feb85e634f155ccc685e72ede68707, cn=Mahadeo Giridhari Jogdand
Date: 2017.03.30 12:25:38 +05'30'

**(म.गि.जोगदंड)**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव,

५. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१०.महालेखापाल, महराष्ट्र-२, नागपूर,
११.सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव,
१२.सर्व विभागीय आयुक्त,
१३.नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गोवा),मुंबई,
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ,
१७.सर्व उप आयुक्त (पुरवठा),
१८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१९.सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२०.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२१.उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२२.सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
२३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
२४.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
२५.मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
२६.सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
२७.सर्व विरोधी पक्षनेते.
२८. निवड नस्ती (सं.क.)